**सामाजिक न्याय विभागातंर्गत निवासी शाळा/आश्रमशाळांमधील सर्व शिक्षक-शिक्षकेतर कर्मचा-यांना आश्रमशाळेच्या मुख्यालयी मुक्काम करणे बंधनकारक असल्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- विभशा २०१६/प्र.क्र.४०९/विजाभज-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २६ डिसेंबर, २०१६

**संदर्भ:** शासन परिपत्रक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. वैखप्र -२०११/ प्र.क्र. ३८१/विजाभज-२, दि. २३ फेब्रुवारी, २०१२.

**परिपत्रक**

सामाजिक न्याय विभागातंर्गत विमुक्त जाती भटक्या जमातीच्या अनुदानित आश्रमशाळा व कनिष्ठ महाविद्यालये,ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी असलेल्या अनुदानित आश्रमशाळा, अनुसूचित जातीच्या अनुदानित आश्रमशाळा, मागसवर्गीय मुलांमुलींची अनुदानित वसतीगृहे व अपंग संस्थांच्या शाळा (विशेष शाळा/कर्मशाळा) या निवासी शाळा/आश्रमशाळा कार्यरत आहेत. सदर आश्रमशाळांमध्ये रात्रीच्या वेळी विद्यार्थी व विद्यार्थीनी राहत असतात. तेव्हा काही दुदैवी घटना,नैसर्गिक आपत्ती यासारख्या घटना घडल्यास विद्यार्थी-विद्यार्थीनींना तातडीने मदत करण्याच्या दृष्टीने शाळा/आश्रमशाळांमध्ये कर्मचारी हजर असणे आवश्यक आहे. अपंग शाळा/आश्रमशाळा व वसतीगृहे निवासी असल्याने सर्व शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांनी शाळा/आश्रमशाळेच्या मुख्यालयी राहणे बंधनकारक आहे. यासंदर्भात शासनाने संदर्भाधीन परिपत्रकान्वये सविस्तर निर्देश यापूर्वीच दिलेले आहेत. तथापि, सामाजिक न्याय विभागांतर्गत विमुक्त जाती भटक्या जमातीच्या अनुदानित आश्रमशाळा व कनिष्ठ महाविद्यालय, ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी असलेल्या अनुदानित आश्रमशाळा,अनुसूचित जातीच्या अनुदानित आश्रमशाळा,मागासवर्गीय मुलांमुलींची अनुदानित वसतीगृहे व अपंग संस्थांच्या शाळा (विशेष शाळा/कर्मशाळा) येथील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी अपंग शाळा/विजाभज व अनुसूचित जातीच्या आश्रमशाळेच्या वसतीगृहाच्या मुख्यालयी राहत नसल्याचे शासनाच्या वेळोवेळी निदर्शनास आले आहे याबाबत लोकप्रतिनिधींनीही शासनाकडे तक्रार केली आहे. शासनाच्या परिपत्रकातील निर्देशांचे पालन न करणे ही बाब अत्यंत गंभीर आहे.

२. सबब, शासन पुनश्च असे निर्देश देत आहे की, सामाजिक न्याय विभागातंर्गत विमुक्त जाती भटक्या जमातीच्या अनुदानित आश्रमशाळा व कनिष्ठ महाविद्यालये,ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी असलेल्या शासकीय /अनुदानित आश्रमशाळा, अनुसूचित जातीच्या अनुदानित आश्रमशाळा, मागासवर्गीय मुलांमुलींची शासकीय/अनुदानित वसतीगृहे व अपंग संस्थांच्या शाळा (विशेष शाळा/कर्मशाळा)येथील सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना मुख्यालयी राहणे बंधनकारक करण्यात येत आहे. याबाबत सहाय्यक आयुक्त/जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद यांनी वेळोवेळी तपासणी करावी. यामध्ये कुचराई किंवा जे कर्मचारी मुख्यालयाच्या ठिकाणी राहणार नाही. त्यांच्यावर कडक कारवाई करुन शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. शासनाच्या आदेशांचे सक्तपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१२२६१६०३४५८७२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2016.12.26 16:07:21 +05'30'

(अ.कों. आहिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे
३) आयुक्त, अपंगकल्याण आयुक्तालय, पुणे
४) सर्व जिल्हाधिकारी
५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,
७) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
८) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
९) कार्यासन शिक्षण-२/अ.क.-१, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय
१०) निवडनस्ती.

**प्रत-**

१. मा.मंत्री (सा. न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (सा.न्या व वि.स. यांचे खाजगी सचिव,